श्री.जे.ए.मोरे, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,सिधुदुर्ग येथील पदस्थापना रद्द करुन बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी), बीड या पदावर पुर्न पदस्थापना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

महिला व बाल विकास विभाग
शासन आदेश क्रमांक : न्यायाप्र- २०१९/प्र.क्र.९/कार्या-७
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ डिसेंबर, २०१९

वाचा:- १. शासन आदेश क्रमांक : मबाआ- २०१९/प्र.क्र.१८/कार्या-७,दि.३१.५.२०१९
२. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांचे दि. २२.११.२०१९ चे आदेश

## शासन आदेश

वाचा क्र.१ अन्वये श्री.जे.ए.मोरे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),बीड यांची जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, सिंधुदर्ग या पदावर बदली करण्यात आली होती. सदर बदली आदेशाविरुध्द श्री.जे.ए.मोरे यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण ,मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे दावा दाखल केला होता.

त्यानुषंगाने वाचा क्र.२ अन्वये मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांनी दि. २२.११.२०१९ च्या आदेशान्वये श्री.मोरे यांची जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, सिंधुदुर्ग या पदावर करण्यात आलेली बदली रद्द करुन बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना) बीड या पदावर पुर्नपदस्थापना देण्याचे आदेश दिलेले आहेत.

त्यानुसार, श्री.मोरे यांना पुढील प्रमाणे पुर्नपदस्थापना देण्यात येत आहे.तथापि, आता श्री.मोरे यांना बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना) बीड या पदावर ३ वर्षापेक्षा जास्त कालावधी झालेला असल्याने ते सन २०२० मध्ये होणाऱ्या सर्वसाधारण बदलीस पात्र राहतील.

| अ. क्र. | अधिका-याचे नाव | सध्या कार्यरत कार्यालय | पुर्नपदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. जे.ए.मोरे | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, सिंधुदुर्ग | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), बीड |

२. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येते की, वरीलप्रमाणे पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्याच्या पदस्थापनेचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३. वरीलप्रमाणे करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्याच्या पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

४. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्याच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

५. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्याच्या पदस्थापनाने देण्यात आलेल्या पदावर रुजू करुन घेताना, ते रजेवर / गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय / परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

६. सदरहू बदली विनंती बदली असल्याने उपरोक्त अधिकारी यांना बदली विषयक प्रवासभत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२१२१७३२३०२१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.12.26 14:47:33 +05'30'

**(ला.रा.गुजर)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई
३. मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.सचिव (म.व बा.वि),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मुंबई
६. विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास,औरंगाबाद विभाग/ कोकण विभाग (आयुक्तालय, पुणे मार्फत)
७. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर (आयुक्तालय, पुणे मार्फत)
८. संबंधित अधिदान व लेखाधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालय, पुणे मार्फत)
९. संबंधित अधिकारी, (आयुक्तालय, पुणे मार्फत)
१०. निवडनस्ती ,कार्यासन ७ महिला व बाल विकास विभाग.